आदिवासी विकास सेवेतील गट- अ मधील सहायक आयुक्त / वरिष्ठ संशोधन अधिकारी /प्रकल्प अधिकारी (श्रेणी-२) या पदावरील पदोन्नती कोट्यातील तदर्थ पदोन्नतीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बढती-२०२२/प्र.क्र.५०१ /का.१५**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ११ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०१५/प्र.क्र.३१०/का-१२ दि.१५/१२/२०१७.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०१५/प्र.क्र.३१०/का-१२ दि.३०/०८/२०१८.

३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का-१२ दि.०१/०८/२०१९.

४) सामान्य प्रशासन विभाग शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/ प्र.क्र.४९/ का.१२, दि.१४/०७/२०२१.

**शासन निर्णय:-**

आदिवासी विकास सेवेतील खालील सहायक प्रकल्प अधिकारी / संशोधन अधिकारी व तत्सम गट- ब (वेतनस्तर S-१५ : ४१८००-१३२३००) संवर्गामधील अधिकाऱ्यांना सहायक आयुक्त / वरिष्ठ संशोधन अधिकारी / प्रकल्प अधिकारी (श्रेणी-२) गट- अ या संवर्गात (वेतनस्तर रुपये S-२० : ५६१००-१७७५००) या आदेशान्वये संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णय अन्वये पदोन्नती कोट्यातील जागांवर तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का-१२ दि.०१/०८/२०१९ आणि सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/ प्र.क्र.४९/ का.१२, दि.१४/०७/२०२१ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहित केलेल्या महसूली विभाग वाटप नियम, २०२१ मधील तरतुदींच्या अधिन राहून खालील तक्त्यातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदोन्नती कोट्यातील पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. सुनिल बारसे | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळमनुरी. | श्री. लोखंडे, प्र. अ., कळमनुरी यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या जागेवर. |

३. श्री. बारसे यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) पदोन्नती व सरळसेवा कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाजेष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब यांनी दि.०७/०५/२०२१ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

२) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६ अ यांनी दि.२०/०४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

३) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५/१२/२०१७ व दि. ३०/०८/२०१८ च्या शासन निर्णयान्वये विभागीय चौकशी/न्यायालीन प्रकरण प्रलंबित असलेले अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देतांना अवलंबावयाची कार्यपद्धती नमूद केली आहे. त्यानुसार श्री. बारसे यांना सेवाजेष्ठतेनुसार सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या तरतूदींच्या अधिन राहून पदोन्नती कोटयातील पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. शिस्तभंगविषयक / न्यायालयीन कार्यवाहीच्या अधीन दिली जाणारी तदर्थ पदोन्नती केवळ तात्पूरती असेल व या तदर्थ पदोन्नतीमूळे नियमितपणाचे व जेष्ठतेचे कोणतेही लाभ सदरहू अधिकाऱ्यांना मिळणार नाहीत. तसेच तदर्थ पदोन्नती "पुढील आदेशापर्यंत असेल" तसेच कोणत्याही वेळी दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करुन मूळ पदावर पदावनत करण्याचा हक्क शासन राखून ठेवीत आहे.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना दि.१४/०७/२०२१ अन्वये तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यापासून तीस

दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. संबंधित अधिकारी विहित मूदतीत संबंधित महसूल विभागात रुजु झाले नाही, तर संबंधित अधिकाऱ्यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. या तरतूदींच्या अनुषंगाने प्रस्तुत आदेशामधील अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदस्थापनेवर तात्काळ रुजू होण्याची दक्षता घ्यावी.

५. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना नविन पदावर रुजू होण्यासाठी कार्यालय प्रमुख / विभागप्रमुखांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधिताना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्विकारल्यानंतर त्यांचा अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास (pawankumar.bandgar@nic.in) ई मेल वर त्वरीत सादर करावा.

६. संबंधित अधिकाऱ्यांने पदोन्नतीच्या पदावर हजर न होता लोकप्रतिनिधी मार्फत पदस्थापनेत बदल करण्याबाबत शासनावर दबाव आणल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंगविषय कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१११८५६३२१७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWANKUMAR BAPURAO BANDGAR

Digitally signed by PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de4f5b7703ab4e5e10ca414432353e1fedec0ed7e9030a2b4ef40ed6f5180db0, pseudonym=5EB45DBDB7827935E861F4F138005D49199129A1, serialNumber=DDD9DA8FA21A90D7D094A7A2B297309EED70A74C6C632CA84301EB132C1FB5FD, cn=PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
Date: 2023.07.11 18:57:33 +05'30'

**(पवनकुमार बंडगर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर

६. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक/ अमरावती / नागपूर
८. सर्व सह /उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सहआयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती
१०.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
११.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३.संबंधित अधिकारी
१४.निवड नस्ती (का.१५)